नवनाथ भक्तिसार  अध्याय एकोणीसावा

कानिफनाथांनी राजा गोपीचंदाच्या साकार्याने श्रीगुरु जालिंदरनाथांना दृश्यमान केले. अक्षरशः तहत अकरा वर्षे भूगर्भात ध्यानस्थ बसलेल्या श्रीगुरूंना त्यांचा क्रोध शांत करून प्रकट करणे हे एक दिव्यच होते पण कानिफनाथांनी अत्यंत कुशलतेने गोपीचंदाचे प्राणही वाचवले व शीरगुरुंकरावी त्याला आशीर्वादच्या रूपातून चिरंजीवित्व प्राप्त करवून दिले आणि त्याचे आयुष्य समृद्ध केले. त्याचक्षणी गोपीचंदाने भौतिक वैभवाचा त्याग करून नाथपंथांची दीक्षा घेतली. त्याचा हा निर्णय त्याच्या सोळाशे राण्यांना सहन झाला नाही. त्यमुळे मोठा शोक निर्माण झाला. राज्यातील प्रजा ही प्रचंड दुःखी झाली पण गोपीचंद आपल्या निश्चयापासून ढळला नाही. तो आता राजा राहिला नव्हता तर सर्वसामान्य नाथपंथीय संन्यासी झाला होता. श्रीगुरु कानिफनाथ आणि श्रीगुरु जालिंदरनाथ ह्यांच्या आज्ञेवरून गोपीचंद हिमालयातील बद्रिकाश्रमात बारा वर्षांच्या उग्र तपासाठी निघाला. मार्गात त्याला महाराज तिलकचंदाचे पौलपट्टण राज्य लागले. गोपीचंदाची बहिण चंपावतीचे हे सासरे, त्यांना गोपीचंदाने नाथपंथीय होऊन संन्यास घेतल्याचे मुळीच आवडले नाही. त्यामुळे चंपावतीच्या सासरच्या मंडळीनी तिची यथेच्छ चेष्टामस्करी व तीव्र उपेक्षा केली. गोपीचंदालाही अतिशय अपमानास्पद वागणूक दिली. अपमानाची परिसीमा झाल्याने चंपावतीने आत्मघात केला. पण श्रीगुरूंवर निस्सीम श्रद्धा असल्याने गोपीचंदाने जालिंदरनाथांना पाचारण केले. श्रीगुरु गोपीचंदासाठी धावले आणि चंपावतीचे सरणावर दहन झाले असतांनाही संजीवनी मंत्राने तिला पुनश्च जिवंत केले. अशा रीतीने राणी मैनावती, पुत्र गोपीचंद आणि कन्या चंपावती हे तिघेही श्रीगुरूंच्या कृपेने अजरामर झाले. हे मागील अध्यायात आपण वाचले, आता पुढे...

श्रीगुरुदेव मच्छिंद्रनाथ स्त्री राज्यात असल्याचे कानिफनाथांकडून गोरक्षनाथांना समजले होते. त्यामुळे गुरु भेटीसाठी ते गौडबंगाल, कौलबंगाल देशाच्या सीमा पार करून स्त्री राज्याच्या समीप येऊन पोहोचले. अथकपणे मार्गक्रमण केल्यानंतर आता थोडेच अंतर पार करावयाचे बाकी आहे. मजल दरमजल करतांना मनामध्ये विचार आले, “स्त्री देश मोठा संपन्न आणि समृद्ध असल्याचे ऐकले आहे. गुरदेव तेथील स्वामिनीचे स्वामी असून वैभवात लोळत आहेत. मला ओळखतील का? वैभवाच्या, ऐश्वर्याच्या कैफात माणूस गोरगरिबांना ओळखत नाही. सूर्यापुढे काजवं काय तोंड वर करणार? मेरू पुढे मशक, पाचस्पतीसमोर मैंदाची अवस्था, हिऱ्याच्या तेजपुढे गारगोटी, परीसापुढे दगड किंवा सुवर्णापुढे धोंडा यांची बरोबरी शक्य नाही. तद्वत मी कंगाल जोगी म्हणजे क्षुद्र धुळीचा कण किंवा झाडाचा पाला! मला कशाला कोण ओळखेल? मला पाहून मच्छिंद्रनाथांना रागसुद्धा येईल. रोज षड्रसायुक्त पंचपक्वान्नाचे सेवन करणारा, सुखसंपत्तीत लोळत असलेला महाराजा माझ्या सांगण्यावरून बैरागी होणे अशक्यच आहे. माझी ब्याद टाळण्यासाठी माझाच काटा काढणे त्यांना सहज शक्य आहे, कारण ते सर्व शक्तिमान आहेत. जर का अशी वेळ आली तर मी त्यांच्याशी युद्ध करावे काय? नाही जमणार ते. सर्वस्वी अशक्य, असंभव! जे गुरुचरण वंदनीय आहेत त्यांच्याशी संघर्ष झाल्यास नाहक अपकीर्ती होईल. काय करू मी?” असे परस्पर प्रतिशोध करणाऱ्या विचारांचा कल्लोळ गोरक्षनाथांच्या अंतरंगात घालमेल करीत होता.

योगायोगाने त्याच समयी स्त्री राज्यात प्रवेश करण्यासाठी जात असलेल्या गणिकांचा घोळका गोराक्षांनी पहिला. या कलावंतीणीमधील मुख्य नर्तिका कलिंगा, ही मदनाची पत्नी रतीपेक्षाही अधिक लावण्यवती होती. तिचा नितळ देखणा चेहरा पाहुन साक्षात सौदामिनीसुद्धा ढगांत तोंड लपवित असे. तिच्या नयनबाणांनी भले भले तपस्वी सुद्धा कामविकारी होत असत. अशी ती सर्वगुणसंपन्न कामिनी गारगोट्यांमध्ये हिऱ्याप्रमाणे लखलखत होती. तिच्या नृत्य कौशल्यापुढे

गंधर्व अप्सरासुद्धा शरणागत होत. ही कलागुण संपन्न कामिनी स्त्रीराज्याकडे कशासाठी जात असावी या उत्सुकतेने गोरक्षनाथांनी तिला विचारले, “बाईसाहेब! आपले नाव काय? आपण कोठे जात आहात? आणि कोणत्या कारणासाठी जात आहात?

त्यावर ती म्हणाली, “मी कलिंगा, स्त्री राज्यात जात आहे. कारण त्या देशाची राणी पद्मिनी उर्फ मैनाकिनी ही कलाप्रेमी असून तिला नृत्य, गायन, कला इत्यादी सदर करून प्रसन्न केल्यास आम्हाला भरपूर बिदागी मिळेल. त्यासाठी आम्ही निघालो आहोत.

गोरक्षनाथांच्या मनात विचार आला की, “या नृत्यांगने सोबत स्त्री राज्यात प्रवेश करणे सोपे जाईल. तिच्या सोबतीने गुप्त वेष धारण करून थेट राजमहालात पोहोचणे आणि गुरुदेवांना भेटणे सहज शक्य आहे,” ते कालींगेला म्हणाले, “बाई! मला ही तुमच्या सोबत न्याल तर उपकार होतील.''

“साधुमहाराज! आमच्या मेळाव्यांत सामील होण्यासाठी कोणती कला आपणास अवगत आहे?” गोरक्ष म्हणाले, “बाई आपण सुस्वरात गायन करीत असतांना, मी कुशलतेने मृदुंग व इतर वाद्ये वाजवून साथसंगत करू शकतो.” “स्वामीराज! गाणे बजावणे ही कला सहजसाध्य नसते, प्रथम तुमचे कौशल्य आम्हांस दाखवा!”

“अवश्य! त्यासाठी विलंब कशाला, हातच्या कंकणाला आरसा कशाला? अमृताने अमृतव आणि परिसाच्या स्पर्शाने सुवर्णत्व येतेच. शंका मनात येत नाही. क्षणभर येथेच थांबून माझी परीक्षा घ्यावी.” गोरक्षनाथांच्या दुर्दम्य आत्मविश्वासात्म्क बोलण्याने मुख्य नायिका कलिंगा बग्गीतून खाली उतरली. सारंगी हातात देत म्हणाली, “वाजवून दाखवा बरे ही सारंगी, कसे वाजवता पाहू या!” गोरक्षनाथांनी गंधर्व प्रयोगाने कपाळाला भस्म लावले. दशदिशांना फेकले आणि समोरच्या सर्व साज वाद्यांना ही लावले आणि म्हणाले, “हं करा सुरवात. सुस्वर वादन आणि गायन करावे.” त्या आदेशान्वये सर्व वाद्ये आपोआप स्वयंप्रेरणेने तालसूर सांभाळून सुरेल वादन करू लागली. आसपासच्या झाडाझुडपांतून, पाषाणांतून सुमधुर सुरातील गायनवादन ऐकू येऊ लागले. वातावरण स्वरमय झाले. ते अलौकिक संगीत ऐकून कलिंगा अचंबित झाली. “हा साधू तर साक्षात श्री शंकराप्रमाणेच कलागुणसंपन्न आहे. ज्याच्या नुसत्या आज्ञेने वाद्ये आपोआप वाजतात आणि वृक्ष, वेली, पाषाण गायन करतात, तो पुरुष संगीत क्षेत्रात किती प्रतिभावंत असला पाहिजे? त्याला स्वातःला गंधर्वाप्रमाणे गायन करणे निश्चितच शक्य आहे. अशा प्रज्ञावंताच्या संगतीत राहणे भाग्याचे ठरणार आहे.” ती गोराक्षनाथांना म्हणाली, “स्वामी! मी कलागुणांविषयी अस्था असणारी कलावंतीण आहे, कला गुणांची चाहती आहे. आपले नाव समजले तर उपकार होतील.'' गोराक्षनाथ विचार करू लागले, “आपण ज्या कामासाठी आलो आहोत त्याचे स्वरूप लक्षात घेता आपले नाव गुप्त ठेवणे अत्यावश्यक आहे. कार्य साध्य होईपर्यंत नाव उघड होऊ नये.” मग त्यांनी खोटे नाव सांगितले, “बऐसाहेब माझे नाव ‘पुर्वंडा’!”

“पुर्वंडराया! आपल्या मानधनाचे काय ते स्पष्ट सांगा.”

गोरक्षनाथ म्हणाले, “बाई! मी बैरागीवृत्तीचा कलंदर माणूस आहे. मला भौतीक धनसंपत्ती, विषय, वासना यांत अजिबात स्वारस्य नाही. फक्त एक वेळ पोटभर अन्न द्यावे. म्हणजे पुरे झाले.” कलिंगा म्हणाली, “पुर्वंडस्वामी! तेवढे तर नक्कीच मिळेल पण माझ्या मनात एक चिंता आहे आपण स्त्री राज्यात जात आहोत, तेथे पुरुष जगत नाहीत.”

पुरुष का जगत नाहीत? असे विचारता कलिंगा म्हणाली, "मारुती हा उधर्वरेता असून त्याच्या भुभुःकाराने तेथील स्त्रिया गरोदर राहतात त्याच्या भुभुःकाराने नर गर्भ पडून जातो केवळ स्त्री गर्भ वाचतो. त्या भुभुःकारात दुसरा कोणी बाहेरील पुरुष सापडल्यास त्याचाही मृत्यु होतो. तर आपले काय होईल ही चिंता वाटते."

"बाईसाहेब, आपण कशाला चिंता करता? हनुमंताचे भय मला नाही. मी महातपस्वी आहे. सूर्याला गिळण्याचे सामर्थ्य असतांना बारीक ठिणग्यांची काय कथा? असल्या संकटांना डगमगून जाण्याचे कारण नाही. आपण निश्चिंत रहा." असे म्हणून गोरक्षनाथ बैठकीपासून जरा दूर गेले. एक पूर्व तयारी, सावधगिरीची उपाययोजना म्हणून प्रथम वज्रास्त्र जपून पेरले. त्याच्या आत बलाढ्य स्पर्शास्त्र टाकून ठेवले त्यानंतर मोहनास्त्राची पेरणी केली, सर्वात आतल्या बाजूने भयंकर नागास्त्र विराजमान केले. एका पाठोपाठ चार अस्त्र शक्तीने स्त्री राज्याचा सीमाभाग बंदिस्त केला. नंतर कालींगेजवळ येऊन गोरक्षनाथ म्हणाले, "चालावे बाईजी! आपण बग्गीत बसावे. मी पुढे बसून लगाम सांभाळतो, बग्गी चालवतो."

अशाप्रकारे तापोयोगी गोरक्षनाथ, श्रीगुरू दर्शनासाठी कलावंतीणीचा सारथी होऊन स्त्री राज्याची सीमा ओलांडून एक योजन अंतर पार करून गेला. रात्र झाल्याने चीनापट्टण गावात मुक्कामासाठी तंबू उभारले. भोजन आटोपून निद्रेची आराधना करीत अंथरुणावर पडले. टिपूर चांदणे पडले होते आणि त्या चांदण्यात सृष्टी न्हाऊन निघाली होती. रात्रीचा एक प्रहर उलटून गेला, माथ्यावर आलेल्या चंद्राचा आल्हाददायी प्रकश आसमंतात पसरला होता. जणू काही माता भगवती हातात चंद्रज्योत घेऊन विहारासाठी निघाली आहे. जणू काही पृथ्वी हा सोन्याचा गोलक आहे आणि त्यावर नक्षत्रे, तारकारुपी माणिकमोत्यांची कलाकुसर काढली असून मध्यभागी चंद्रमा शोभत आहे, रात्र नव्हे तर भद्रकालीचे शामल मुख आहे आणि तिने गळयांत, कानांत, केसांत ताऱ्यांचे, नक्षत्रांचे अलंकार परिधान केले आहेत. अशी ही भद्रकाली धरणीवर अवतरली आहे. तिच्या शीतल शामल प्रकाशाने वनदेवी न्हाऊन निघाली आहे.

नित्यनियमाप्रमाणे हनुमंत मध्यरात्री सेतू रामेश्वराहून निघाला आणि स्त्री राज्यात भुभुःकार करण्यासाठी सीमेवर येऊन पोहोचला. सीमा ओलांडताच धडकन वज्रासन छातीवर आदळले, बेसावधपणे आघात झाल्यामुळे हनुमंत मूर्च्छित होऊन कोसळला, स्पर्शास्त्राच्या प्रभावाने भूमीला चिकटला गेला. मोहनास्त्राने बुद्धी भ्रमीत झाली आणि नागास्त्राने पायांपासून छातीपर्यंत गुंडाळून फणा काढून फुत्कार केला. अचानक असे एकत्रितपणे हल्ले झाल्याने वायुपुत्र तळमळू लागला. उड्डाण करण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु शक्ती कमी पडू लागली, पुन्हा पुन्हा भोवळ येऊ लागली, आपण कोणं, कुठे आहोत, कुठून आलो याचे विस्मरण होऊ लागले. देहात त्राण उरले नाही. एक प्रहर झाला, वज्रदेही मारुतीने डोळे पांढरे केले. रक्ताच्या गुळण्या बाहेर पडून रक्ताचे लोट वाहू लागले. आता आपण वाचत नाही, आपली अंतिम वेळ आली याची जाणीव झाल्यामुळे त्याच्या अंतःकरणातून आवाज उमटला, "हे राम! हे रघुनंदना!! हे द्याळा करुणाकारा! मी तुझा भक्त, तुझा दूत संकटात पडलो आहे. आणि तुला झोप लागली आहे की काय? हे प्रभू !! मला संकटातून सोडव धाव रे रामा..." हनुमंताचे आर्त स्वर प्रभू रामचंद्राच्या कानावर पडताच, त्यांनाही वायुनंदन संकटात असल्याचे जाणविले. प्रभू रामचंद्र धनुष्यबाण सज्ज करीत क्षणार्धात प्रकटले. आपल्या प्राणप्रिय भक्ताची अवस्था पाहून ते कळवळले, बाळासाठी माता, बछड्यासाठी गाय, पडसासाठी हरीणी जसे दुःखाने व्यथित होतात तसे भक्तासाठी भगवंताचे प्राण कासावीस झाले. धनुष्यबाण सज्ज करून इंद्रास्त्राचा उपयोग केला, इंद्रस्त्राने वाज्रास्त्राला भेदले. विभाक्तास्त्राने स्पर्शास्त्र दुबळे केले. नागस्त्राला धरून हातानी गुंडाळले, त्याचबरोबर महासागरात वास करीत असलेले लक्ष्मी नारायण प्रकट झाले आणि म्हणाले, "प्रभू रामराया! आपण आणि आपला भक्त, वायुपुत्र मारुती दोघेही आम्हांस

प्रिय आहात तरी आता शेषनागाला सोडावे. त्याने हनुमंताला तर आता मुक्तही केले आहे.” असे म्हणून नागास्त्र आवरून घेतले. तसेच प्रत्यक्ष विष्णू रुपात प्रकट होऊन मोहनास्त्र काढून घेतले आणि अंतर्धान पावले.

अंजनीसुत मारुती सावध होऊ लागला, उठून मनामध्ये प्रभू रामाचे नामस्मरण करीत आहे. भानावर येऊन पाहतोय तर प्रत्यक्ष प्रभु प्रकट झाले आहेत, त्याने श्रद्धापूर्वक पायावर लोटांगण घातले. हात जोडून म्हणाला, “प्रभू आपण होतात म्हणून माझे प्राण वाचले, अशा प्रकारचा अस्त्र हल्ला मी पहिला अथवा अनुभवला नव्हता. काळाचाही काळ असणाऱ्या त्या शक्तीने माझा अंत जवळ आणला होता परंतु आपण धावून आलात आणि माझे रक्षण केलेत. मी आपला उतराई होणे केवळ अशक्य आहे. प्रभू! मला तुमच्या ऋणांत आणि दास्यत्वातच आनंद आहे.” असे म्हणत पुन्हा लोटांगण घातले. प्रभुने हनुमंताला उठ्वून पोटाशी धरले आणि म्हणाले, “रामभक्ता! तुझ्यासाठी येण्याची ही माझी तिसरी वेळ आहे. आता यावेळी कोण शत्रू उद्भवला?

प्रभू, शत्रू कोण आहे तो दिसलाच नाही. बेसावध असतांना अस्त्रशक्तींनी अचानकपणे एकत्रित हल्ला केला. असा कोणी क्षत्रिय योद्धा सांप्रत युगात उरला नाहीय! परंतु नाथपंथी योग्याजवळ अशी प्रबळ अस्त्रे आश्रयास आहेत. त्यांच्यापैकीच कोणी पराक्रमी येथे आला असावा. प्रस्तुत काळात त्यांच्याकडेच असे पराक्रमी आहेत.

“महाबली हनुमंता! नाथपंथीय तपस्वी आहेत विनाकारण त्यांची काळी काढू नयेत. त्यांना साक्षात परमेश्वरी वरदान आहे. मलाही ते प्रिय आहेत, त्यांच्याशी वैर धरू नये.” असे म्हणून प्रभू रामाने दिव्य दृष्टीने पहिले... त्यांना स्त्री राज्यात एक योजन अंतरावर गोरक्षनाथ दृष्टीस पडले. ते पाहून प्रभू रामचंद्र म्हणाले, “बजरंगा! गोरक्षनाथाच्या अवतारामाधल्या हरीनारयाणाचा हा प्रताप आहे.”

हनुमंत म्हणाला, “प्रभू चला आपण त्यांच्याकडे जाऊ या. गोरक्षनाथ हा चतुर योद्धा आहे. त्याने चतुराईने सीमेवर अस्त्रांची पेरणी करून सुरक्षितपणे स्त्री राज्यात प्रवेश केला आहे. त्यांच्याकडे माझे काम आहे ते आपणांकडून होण्यासारखे आहे. “कोणते काम मी करू वायुसुता!” अशी रामाने विचारणा केल्यावर हनुमंताने मैनाकिनीच्या उग्र तपापासून ते मच्छिंद्रनाथाच्या स्त्री राज्य गमानापर्यंतचा संपूर्ण इतिहास प्रभू रामचंद्रांना ऐकविला आणि विनंती कली, “आता गोरक्षनाथ स्त्री राज्यातून मच्छिंद्राला नेणार नाही असे करावे.” त्यावर प्रभू रामचंद्र म्हणाले.

“ठीक आहे! भक्ताचा हट्ट पुरवला पाहिजे. युक्ती प्रयुक्तीने बोलून तुझ्यासाठी एवढे मागून घेण्याचा प्रयत्न अवश्य करीन, चलू या.” असे आश्वासन प्रभू रामचंद्रांनी दिले.

मध्यरात्रीच्या समयास चिनापट्टण गावात गोरक्षनाथांजवळ प्रभू रामचंद्र आणि हनुमंत पोहोचले. सर्वजण गाढ निद्रेत असतांना, या दोघांनी रूप बदलून ब्राह्मण वेष धारण केला. गोरक्षनाथ जागेच आहेत. दोघे ब्राह्मण रुपात आले व त्यांना नमस्कार करून त्यांच्याजवळ बसत म्हणाले, “आम्ही षडशास्त्री ब्राह्मण आहोत, तुम्ही तर योगियांचे मुकुटमणी, जितेंद्रिय आणि विरक्त नाथपंथीय साधू दिसत आहात. आपणांसारखे तपस्वी साधूमहाराज कृपावंत असतात प्रेमळ, दयाळू, अजातशत्रू आणि उदारही असतात. आम्ही आमची मनोकामना व्यक्त करतो ती आपण पूर्ण करावी.”

“विप्रजनहो! मी आपली काय सेवा करू शकतो? तेवढेच सांगावे.” असे गोरक्षनाथ म्हणाले पण या उत्तरावर ब्राह्मण रूपातील प्रभू रामचंद्र आणि हनुमंत म्हणाले, “योगीराज! आपण प्रथम वचन द्यावे, मगच आम्ही सांगू.” गोरक्षनाथ

चक्रावलेच. “एवढे गूढ, गहन काय काम असेल? वचन दिल्याशिवाय सांगणार नाही म्हणतात, यांनी घेण्यासारखे माझ्याकडे काय आहे? शिंगी, सारंगी, कुबडी, फावडी, मुद्रा, शैली, कंथा, घोंगडी, भिक्षापात्र असे संन्यासी साहित्य ह्यांच्या काय उपयोगाचे? यांच्या विचारण्यात काहीतरी गूढ अर्थ आहे. शिवाय आता मध्यरात्र उलटून गेली आहे, स्त्री राज्यात कुणी मानव पुरषांचा प्रवेश असंभव आहे. हे विप्र नक्क्कीच मानव नसून कोणतरी अवतारी देव आहेत. शुक्र, वरूण, गभस्ती, वाचस्पती, ब्रम्हा, गण, गंधर्व, यक्ष, किन्नर यापैकी तपोलोकातील कुणीतरी असावेत.” असा विचार करून अंतर्मनाने शोध घेण्याचा प्रयत्न केला. परंतु स्पष्ट बोध होईना. मग पुन्हा मनाशी विचार केला की, “असो! आपण ज्या कामासाठी निघालो आहोत त्याच्या व्यतिरिक्त यांच्या मागणीचा जरूर विचार करूया.” मग उघड पणे म्हणाले, “सज्जनहो! आपण मानव योनी मधले नक्कीच नाहीत. सीमेवर कृतांत काळालाही लोळवतील अशी चार शक्तिमान अस्त्रे आहेत. मारुतीने प्रवेश करून हल्ला करू नयेत म्हणून स्थापन केली आहेत. त्यांना उल्लंगून आपण स्त्री राज्यात आलात म्हणजेच आपण मानव नाहीत, तरी महाराज; आपण कोण आहात त्याची वास्तव ओळख द्यावी.” असे म्हणून चरणस्पर्श करून वंदन केले. दोघे ब्राह्मण परस्पराकडे पाहून सूचक हसले आणि मूळ स्वरूपात गोरक्षनाथापुढे प्रकट झाले. श्रीरामाने त्यांना हृदयाशी धरून आलिंगन देत म्हणाले, “वत्सा गोरक्षा! हनुमंताची इच्छा आहे की तू मच्छिंद्रनाथांना स्वदेशात घेऊन जाऊ नये. महाराणी मैनाकिनीने घोर तपश्चर्या करून मारुतीला वचनबद्ध करीत मच्छिंद्राना मागून घेतले आहे. तरी मारुतीच्या वचनासाठी मच्छिंद्राला परत नेऊ नये एवढेच तुझ्याजवळ मागणे आहे.

“प्रभू रामराया! आपले म्हणणे खरे आहे परंतु योगाभ्यासी नाथपंथी म्हणून अवतार धरण केला आहे. स्त्री संगासारखे अनुचित कर्म आम्हास शोभादायक आहे का? प्रभू आपणच निर्णय द्यावा, तेवढी एक गोष्ट सोडून आपण माझे प्राण मागीतलेत तरी मी आनंदाने आपल्या चरणी अर्पण करीन परंतु मी गुरुवर्यांना स्त्री राज्यात कदापि राहू देणार नाही.

“अरे बाबा; आमच्या आग्रहाचा थोडा तरी आदर कर!” त्यावर गोरक्ष म्हणाले, “या बाबीवर तडजोड शक्य नाही.” गोरक्षाच्या निश्चयाने प्रभू रामचंद्र भारावून गेले. गोराक्षाचा हात हातात घेऊन म्हणाले, “धन्य धन्य गोरक्षा! धन्य तुझी गुरुभक्ती, धन्य तुझी निष्ठा, तू आदरणीय आहेस.” हनुमंत रागावून म्हणाला, “प्रभू! हा तुमच्या विनंतीचा मान ठेवत नाही, आताच ह्याला धडा शिकवितो.” हनुमंतास आवरत प्रभू म्हणाले, “शांत हो! शांत हो!! शुल्लक गोष्टीसाठी नाहक वादंग कशाला? अरे तू तर मैनाकिनीच्या वचनातून केव्हाच मुक्त झाला आहेस. आता तिच्या प्रारब्धात जे काही असेल तसेच घडून येईल. तू निश्चिंत रहा.” असे म्हणून प्रभुने मारुतीला शांत केले.

प्रभू रामचंद्र त्यांचा निरोप घेऊन निघाले. त्याक्षणी गोरक्षनाथ त्यांच्या पायास बिलगून म्हणाला, “प्रभू सीमेवरील अस्त्रे काढण्याची तसदी दिल्याबद्दल क्षमा मागतो.” त्यांच्या नम्र वक्तव्याने श्रीराम आणि श्री हनुमंत प्रसन्न झाले. त्यांस शुभचिंतन आणि शुभाशीर्वाद देऊन अदृश्य झाले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने मोक्षसाधन प्राप्त होईल.